उपजिल्हा रुग्णालय, गडहिंग्लज, जि.कोल्हापूर येथील महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पांतर्गत बांधकामाबाबत उद्भवलेल्या लवाद प्रकरणामध्ये मा. उच्च न्यायालय यांनी आर्बिट्रेशन अपील क्र.२९/२०१७ मध्ये दिलेल्या आदेशास अनुसरुन कोल्हापूर मंडळातील १० रुग्णालयांच्या स्वीय प्रपंजी खात्यामध्ये उपलब्ध असलेल्या निधी मधून कंत्राटदारास रु.१,८०,९२,७७६/- इतकी रक्कम अदा करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वीप्रपं-२०१८/ प्र.क्र.२२८/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३१ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-

**१) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-६/गडहिंग्जनिधी/९०६३/१८, दि.२४.०८.२०१८.**

**प्रस्तावना :-**

उपजिल्हा रुग्णालय, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर येथील महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पांतर्गत (M.H.S.D.P.) बांधकामाबाबत कंत्राटदार मे. इंजिनिअरींग प्रोजेक्टस (इंडिया) लि., मुंबई यांच्यामध्ये उद्भवलेल्या लवाद प्रकरणामध्ये मा. उच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या आर्बिट्रेशन अपील क्र.२९/२०१७ मध्ये मा. उच्च न्यायालय यांनी दि.३०.०७.२०१८ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन, कोल्हापूर मंडळातील विविध स्वीय प्रपंजी खात्यामध्ये उपलब्ध असलेल्या निधी मधून कंत्राटदारास रु.१,८०,९२,७७६/- इतका निधी अदा करण्याची बाब सदर नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपजिल्हा रुग्णालय, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर येथील महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पांतर्गत (M.H.S.D.P.) बांधकामाबाबत कंत्राटदार मे. इंजिनिअरींग प्रोजेक्टस (इंडिया) लि., मुंबई यांच्यामध्ये उद्भवलेल्या लवाद प्रकरणामध्ये मा. उच्च न्यायालय यांनी आर्बिट्रेशन अपील क्र.२९/२०१७ मध्ये दि.३०.०७.२०१८ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन, कोल्हापूर मंडळातील पुढील तक्त्यात नमूद करण्यात आलेल्या १० रुग्णालयांच्या स्वीय प्रपंजी खात्यांमधून रु.१,८०,९२,७७६/- इतकी रक्कम कंत्राटदार मे. इंजिनिअरींग प्रोजेक्टस (इंडिया) लि., मुंबई यांना अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | स्वीय प्रपंजी खात्यामधील रक्कम |
|---|---|---|
| १ | सेवा रुग्णालय, कोल्हापूर | २६,००,००० |
| २ | वसाहत रुग्णालय, गांधीनगर | २०,००,००० |

| | | |
|---|---|---|
| ३ | उप जिल्हा रुग्णालय, कोडोली | १०,००,००० |
| ४ | ग्रामीण रुग्णालय, पारगाव | १८,००,००० |
| ५ | ग्रामीण रुग्णालय, खुपिरे | ३०,००,००० |
| ६ | ग्रामीण रुग्णालय, आजरा | १२,००,००० |
| ७ | ग्रामीण रुग्णालय, गारगोटी | २८,००,००० |
| ८ | ग्रामीण रुग्णालय, चंदगड | १०,००,००० |
| ९ | ग्रामीण रुग्णालय, नेसरी | १५,००,००० |
| १० | उपजिल्हा रुग्णालय गडहिंग्लज (ग्रा.रु. नेसरी यांच्या खात्यावर) | ११,९२,७७६ |
| एकूण | | १,८०,९२,७७६ |

उपरोक्त तक्यात नमूद करण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खात्यातील रु.१,८०,९२,७७६/- इतकी रक्कम आहरीत करुन उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अधिनस्त असलेल्या आहरण व संवितरण खात्यात वर्ग करुन, सदर रक्कम मे. इंजिनिअरींग प्रोजेक्टस (इंडिया) लि., मुंबई यांना अदा करण्यास, उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांनी याबाबतची आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौचारिक संदर्भ क्र.अनौ.स.२७३/२०१८/व्यय-१३, दि.०४.०८.२०१८ आणि अनौ.संदर्भ क्र. निरंक/२०१८/अर्थ-९, दि.१०.०८.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३११२०९५४०२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2018.08.31 16:45:20 +05'30'

**(प्र. मो. बलकवडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व लेखापरिक्षा), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्टीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन ),पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा,कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
९. उपकोषागार अधिकारी, गडहिंग्लज/आजरा/चंदगड/गारगोटी, जि.कोल्हापूर.
१०. वैद्यकीय अधिक्षक, सेवा रुग्णालय, कोल्हापूर, जि.कोल्हापूर.
११. वैद्यकीय अधिक्षक, वसाहत रुग्णालय, गांधीनगर, जि.कोल्हापूर.
१२. वैद्यकीय अधिक्षक, उप जिल्हा रुग्णालय, कोडोली, जि.कोल्हापूर.
१३. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, पारगाव, जि.कोल्हापूर.
१४. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, खुपिरे, जि.कोल्हापूर.
१५. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, आजरा, जि.कोल्हापूर.
१६. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, गारगोटी, जि.कोल्हापूर.
१७. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, चंदगड, जि.कोल्हापूर.
१८. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, नेसरी, जि.कोल्हापूर.
१९. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय गडहिंग्लज, जि.कोल्हापूर.
२०. वित्त विभाग ( व्यय-१३/अर्थ-९ ), मंत्रालय, मुंबई.
२१. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
२२. कार्यासन अधिकारी (आरोग्य-६), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
२३. निवड नस्ती आरोग्य-४.